**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी अंतर्गत मौजे पिंपळी बु. ता. जि. चिपळूण जि. रत्नागिरी येथे अतिरिक्त ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०६१८/प्र.क्र.१३८/परि-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०४ ऑगस्ट २०१८

**वाचा :**

१) **परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र.ब्रेचाप (२७) /०११७/न.क्र.०१/का.१०(१)/ जा.क्र.८६४९, दि.१४.०६.२०१८**

२) **गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमव्हीडी-०८१५/प्र.क्र.२३३/परि-४, दि.१८.०६.२०१८**

३) **जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी यांचे आदेश क्र. महसूल /०४/जमिन वाटप-२/ प्र.क्र./६४/२०१८/एसआर-चिपळूण -१०/२०१६, दि.०४.०४.२०१८**

**प्रस्तावना :**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी अंतर्गत मौजे झरेवाडी, हातखंबा जि. रत्नागिरी येथे ब्रेक टेस्ट ट्रॅक कार्यरत आहे. रत्नागिरी जिल्ह्यातील खेड, चिपळूण, दापोली, मंडणगड व गुहागर या तालुक्यातील वाहनधारकांसाठी मौजे झरेवाडी, हातखंबा येथील ब्रेक टेस्ट ट्रॅक खुप जास्त अंतरावर आहे. मोटार वाहन विभागांतर्गत नविन प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन कार्यालये स्थापन करणेसंदर्भात नियुक्त केलेल्या समितीने केलेल्या शिफारशीनुसार संदर्भ क्र.२ येथील दि.१८.०६.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये निकष विहित केले आहेत. त्यानुषंगाने उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी अंतर्गत खेड, चिपळूण, दापोली, मंडणगड व गुहागर या तालुक्यांसाठी बेस्ट टेस्ट ट्रॅक तयार करण्यासाठी मौजे पिंपळी बु. ता. जि. चिपळूण येथील गट नं. २७/२, क्षेत्र ६.५३.०० हे. आर या शासकीय जमिनीपैकी ०.९९.००हे. आर. ही शासकीय जमिन जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी यांच्या संदर्भ क्र.३ येथील दि.०४.०४.२०१८ रोजीच्या आदेशान्वये उपलब्ध करुन दिली आहे. त्यानुसार सदर जागेवर ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्याच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, रत्नागिरी अंतर्गत मौजे पिंपळी बु. ता. जि. चिपळूण येथे ब्रेक टेस्ट ट्रॅक उभारण्यासाठीच्या रु.३२,५५,२८१/- (रुपये बत्तीस लक्ष पंचावन्न हजार दोनशे एक्याऐंशी फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च उपलब्ध असलेल्या नियतव्ययामधून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No. | Particulars | | Amount in Rs. |
|---|---|---|---|
| १ | Sub Estimate No.१ | | २६,९०,३१५.१५ |
| २ | Add : GST | १२% | ३,२२,८३७.८२ |
| | Add : Contingencies | ४% | १,०७,६१२.६१ |
| ३ | Add : Centage | ५% | १३४५१६.०० |
| | | Total Rs. | **३२,५५,२८१.५८** |
| | | Say Rs. | **३२,५५,२८१.००** |

२. सदर मान्यता खालील अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) सदर कामाचा खर्च विभागाने उपलब्ध निधीतून भागवावा.

आ) सदरचे अंदाजपत्रक उपभोक्ता विभागाच्या सक्षम प्राधिका-याकडून साक्षांकित करण्यात यावे.

३. यासाठी येणारा खर्च मागणी क्र.बी-३, २०४१ वाहनांवरील कर, (०१)(०६) वाहन चालविण्यासाठी चाचणी घेताना गुणात्मक वाढ करण्याकरिता पायाभूत सोयीमध्ये दर्जावाढ करणे, कृत्रिम चाचणी पथ बांधणे (कार्यक्रमांवरील) (२०४१ ०३२१) १३-कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग-एक, उपविभाग-५, अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ अ) नुसार असलेल्या अधिकारान्वये तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३३६/इमा-२, दि.०६.०७.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०४११५९२४५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2018.08.04 12:34:03 +05'30'

**(द.ह. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
७. प्रादेशिक परिवहन अधिकारी, पनवेल
८. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,रत्नागिरी
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
१२. उप सचिव (इमा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती (परि-४)